# सप्टेंबर गुलाब



जनेट विंटर

# सप्टेंबर गुलाब





11 सप्टेंबर 2011 रोजी अमेरिकेत झालेली दुर्घटना जगभरातील लोकांच्या आयुष्याला स्पर्शून गेली.

ही गोष्ट दक्षिण आफ्रिकेच्या दोन स्त्रियांबद्दल आहे. त्या दोघी त्या दिवशी हजारो गुलाबांची फुले घेऊन अमेरिकेत आल्या होत्या.

त्या एका फुलांच्या प्रदर्शनासाठी आल्या होत्या. पण दुर्घटनेमुळे ते प्रदर्शन रद्द झाले. मग त्या स्त्रियांनी त्या फुलांचा उपयोग काही वेगळ्याच प्रकारे केला.

11 सप्टेंबर 2011 रोजी सकाळी 8:50 वाजता मी माझ्या चित्रकलेच्या टेबलवर काम करत असताना सहज खिडकीबाहेर पाहिले. एम्पायर स्टेट इमारतीच्या पलिकडे मला वर जात असलेले धुराचे लोटच्या लोट दिसले. शहराला झाकून टाकणारा हा धूर वर्ल्ड ट्रेड सेंटरच्या ट्विन टॉवर्समधून बाहेर पडत असल्याचे मला कळले.

काही दिवसांनंतर मी युनियन स्क्वेअर येथे गेले. दुर्घटनेत पिडीत झालेल्या लोकांचे दुःख वाटून घेऊ, या हेतूने. तिथे मला अनेक गुलाबांची फुले दिसली. ही फुले इथे आली कुठून?

ही गोष्ट याच फुलांबाबत आहे.



मी तिथे उभी होते तेव्हा एक तरूण माझ्याकडे आला आणि ही फुले तिथे कुठून आली या मला पडलेल्या प्रश्नाचे उत्तर त्याने मला दिले.

महासागर ओलांडून गेल्यावर
दूरवर दक्षिण आफ्रिकेत



पर्वतांच्या कुशीत



वाळवंटापल्याड



दोन बहिणी एकमेकांसोबत
राहात होत्या. त्या गुलाबांची
शेती करत असत.



त्यांच्या हरितगृहात सर्व तऱ्हेचे गुलाब होते.



लाल गुलाब, पांढरे गुलाब, पिवळे गुलाब.



त्यांच्या घराच्या सभोवती गुलाबच गुलाब होते.



त्यांच्या घरात सर्वत्र गुलाबाचा सुवास दरवळत असे.

दोघी बहिणी फुलांच्या प्रदर्शनात भाग घेण्यासाठी लवकरच दूर न्यूयॉर्क शहरात जाणार होत्या.



प्रदर्शनात गुलांबांची सजावट कशी करायची, याचा आराखडा त्यांनी रात्ररात्र जागून तयार केला.

मग त्यांनी 2,400 गुलाब काळजीपूर्वक खोक्यांमध्ये भरले.



आता त्यांचा दीर्घ प्रवास सुरू होणार होता.



उंच उंच आभाळात

दोघी बहिणी स्वप्ने बघू लागल्या

गुलाबाच्या प्रदर्शनाची.


SEPT. 11, 2001--
ERRORIST ATTACK--NEW YO
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
CANCELED
ACKED PLANES--THOUSANDS DIE

त्यांचे विमान उतरले.

दोघी बहिणी गुलाबांसोबत
विमानतळावर बसून राहिल्या




दिवसभर

रात्रभर.




शहरात कुणी त्यांच्या ओळखी-पाळखीचे नव्हते.

तुम्हाला राहाण्यासाठी
एक जागा आहे.






त्यांचे उपकार कसे
फेडायचे?






तो माणूस दोघा बहिणींना शहरातील युनिक स्क्वेअर या जागी घेऊन गेला.

दोघा बहिणींना काय करायचे ते उमगले.



ती जागा गवताळ होती.
त्यांनी आपले काम सुरू केले.

त्या गवतांतील मोकळ्या जागेत गुलाब ठेवू लागल्या. एकाच्या शेजारी दुसरा, त्याच्या शेजारी तिसरा. त्यांचे हात भरभर चालू लागले.



लवकरच ती गवताळ जागा गुलाबांनी भरून गेली.

दोघा बहिणींचे काम पूर्ण झाले

तेव्हा तिथे कोसळलेले ट्विन
टॉवर्स दिसू लागले.

माझ्या अश्रूंचे
दोन थेंब



त्या गुलाबांवर सांडले.

नंतर मला या गोष्टीबद्दल काही आणखी माहिती मिळाली:

या दोघी स्त्रिया दक्षिण आफ्रिकेत गुलाबांच्या फुलांची शेती करत होत्या. त्या न्यूयॉर्कमध्ये भरणाऱ्या *ॲग्रीफ्लॉवर ॲंड फ्लोरिटेक एक्स्पो* या प्रदर्शनात सहभागी होण्यासाठी आल्या होत्या. ट्विन टॉवर्स उध्वस्त झाल्यावर सगळी विमाने रद्द करण्यात आली. फुलांचे प्रदर्शनही रद्द करण्यात आले. त्यामुळे सगळी हॉटेल्स लोकांनी खचाखच भरली. दोघी बहिणी *ला गार्डिया* विमानतळावरच अडकल्या. तिथे आपल्या दोन हजार गुलांबासोबत त्या थांबून राहिल्या. त्यावेळी न्यूयॉर्कमधील *फर्स्ट युनायटेड मेथॉडिस्ट चर्च*चे लोक विमानतळावर अडकलेल्या प्रवाशांची मदत करण्यासाठी आले होते. त्यांनी दक्षिण आफ्रिकेतून आलेल्या या दोघा बहिणींना आसरा मिळवून दिला.

**समाप्त**